**नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एकस्तर पदोन्नतीच्या लाभाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक विभशा-२०१९/प्र.क्र.१०४२/विजाभज-१**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**१ ला मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दि. ०४ जुन, २०२५**

**संदर्भ-:**
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- टिआरएफ-२०००/प्र.क्र.०३/बारा , दिनांक ०६ ऑगस्ट,२००२.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक- विभशा २००६/प्र.क्र.२५४/मावक-६,दिनांक ०३ डिसेंबर, २००७
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक- एसएसएन १००७/(१६६/०७)/माशि-२, दिनांक १४ ऑगस्ट,२००८
४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक- विभशा-२०१९/प्र.क्र.१०४२/ विजाभज-२, दिनांक १३ मार्च,२०२०
५) मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपिठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.२४४/२०२१ सोबत संलग्नित रिट यांचिकावर दि.२६ एप्रिल,२०२३ रोजी पारित केलेले आदेश
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक- एसआरव्ही-२०२२/प्र.क्र.४८/कार्यासन १२, दि.२९ फेब्रुवारी, २०२४
७) मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपिठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.८४९१/२०२२
८) प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नाशिक यांचे पत्र क्रमांक-प्राउसकना/ आशा/ याचिका/ शपथपत्र/ १०११/, दि.१८ जुलै, २०२३
९) मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपिठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.३१०१/२०२० दि.२३ जून,२०२३ रोजीचे आदेश

**प्रस्तावना :-**

नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात असणाऱ्या आश्रमशाळांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता / एकस्तर पदोन्नतीच्या लाभाबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०६.०८.२००२ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (ब) नुसार आदिवासी उपयोजना क्षेत्रातील समाविष्ट महानगरपालिका/नगर परिषदेच्या क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना वाढीव प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय केलेला दिसून येतो. तसेच परिच्छेद ३ (७) नुसार आदिवासी व नक्षलग्रस्त क्षेत्रात काम करण्यासाठी प्रोत्साहन म्हणून कर्मचारी/अधिकारी त्या क्षेत्रात कार्यरत असेपर्यंतच्या काळात त्यांनी

धारण केलेल्या मूळ पदाच्या नजीकची वरिष्ठ पदोन्नतीची वेतनश्रेणी व त्याअनुषंगाने वेतननिश्चितीचा लाभ दिलेला असून संबंधीत कर्मचारी बिगर आदिवासी क्षेत्रात परत आल्यावर तो त्याच्या मूळच्या संवर्गातील वेतनश्रेणीत पूर्वीच्या वेतनाच्या अनुषंगाने वेतन घेईल, असे नमूद केलेले आहे.

त्यानुसार शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दि.०३.१२.२००७ अन्वये नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रातील (भंडारा, गोदिया, चंद्रपुर गडचिरोली यवतमाळ व नांदेड इ. जिल्ह्यातील) विमुक्त जाती भटक्या जमातीच्या मुलांसाठी असलेल्या सर्व आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता / एकस्तर पदोन्नती लागू करण्यात आली होती.

२. राज्यातील शाळा विभागाचे कामकाज शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णयान्वये चालविले जाते. शालेय शिक्षण विभागाने दि.१४.०८.२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये "शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त/आदिवासी म्हणून घोषित केलेल्या क्षेत्रातील गावे व शहरे येथे काम करण्यासाठी प्रोत्साहन म्हणून मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळा, कनिष्ठ महाविद्यालये व सैनिकी शाळांतील सर्व संबंधीत बदलीपात्र शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी यांना त्या क्षेत्रात कार्यरत असेपर्यंतच्या काळात वरिष्ठ/पदोन्नतीची वेतनश्रेणी मंजूर केली असून ही एकस्तर पदोन्नती संबंधित शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात कार्यरत असेपर्यंतच अनुज्ञेय राहील व यासाठी कमाल वर्षमर्यादा ६ वर्षे इतकीच असेल व त्यानंतर त्यांची बदली कुठल्याही परिस्थितीत या क्षेत्राबाहेर करावी, त्या क्षेत्रातून शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी बिगर आदिवासी/नक्षलग्रस्त क्षेत्रात परत आल्यावर तो त्याच्या मूळच्या संवर्गातील वेतनश्रेणीत पूर्वीच्या वेतनाच्या अनुषंगाने वेतन घेईल, मात्र या अधिकारी / कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आलेला आहे, त्यांना आणखी वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय नसेल, तसेच जे शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी नियुक्तीपासून निवृत्तीपर्यंत नक्षलग्रस्त/आदिवासी क्षेत्रात कार्यरत असतील ते एकस्तर पदोन्नतीसाठी पात्र असणार नाहीत" याप्रमाणे तरतुदी केलेल्या आहेत.

३. इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळा या स्वयंसेवी संस्थांना अनुदान देऊन चालविण्यात येतात. एका स्वयंसेवी संस्थेच्या आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांची बदली इतर स्वयंसेवी संस्थेच्या आश्रमशाळेत करण्यात येत नाही, म्हणजेच विभागाच्या आश्रमशाळेतील कर्मचारी हे बदलीपात्र नसून, कायम कर्मचारी म्हणून निवृत्तीपर्यंत त्याच आश्रमशाळेमध्ये कार्यरत असल्याने, नक्षलग्रस्त/ आदिवासी क्षेत्रात काम करणाऱ्या आश्रमशाळांमधील अशा बदलीपात्र नसलेल्या शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता/ एकस्तर पदोन्नतीचा लाभ अनुज्ञेय नसल्याबाबत वित्त विभागाने दिलेल्या अभिप्रायाच्या आधारे शासन निर्णय, संदर्भ क्र.०४, दि.१३.०३.२०२० अन्वये इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील

कर्मचारी हे बदलीपात्र नसल्याने एकस्तर पदोन्नती / प्रोत्साहन भत्ता देय नसल्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे.

४. शासन स्तरावरुन घेण्यात आलेल्या उक्त निर्णयाविरुध्द श्री. शामसुंदर आबाजी मुळे व इतर यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपिठ नागपूर येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२४४/२०२१ व त्यासोबत संलग्नित रिट याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने पारित केलेले दि.२६.०४.२०२३ रोजीचे आदेश, मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपिठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.८४९१/२०२२ आणि राज्यातील इतर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी केलेल्या विविध रिट याचिका तसेच मा. लोक प्रतिनिधींनी वेळोवेळी केलेली मागणी, प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नाशिक व नागपूर यांचेकडील प्रस्ताव आणि सन २०२४ चे अर्थसंकल्पिय अधिवेशनात औचित्याच्या मुद्याद्वारे देखील आदिवासी भागात असलेल्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळेतील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एकस्तर पदोन्नती / प्रोत्साहन भत्ता देणेबाबत चर्चा झालेली आहे.

५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२९.०२.२०२४ अन्वये, "मूळ नियुक्ती आदिवासी क्षेत्रात झाली असून त्या क्षेत्राबाहेर बदलीपात्र नसलेल्या शासकीय कर्मचाऱ्यास नियुक्तीनंतर लगेच एकस्तर पदोन्नती योजना लागू होते व त्यानुसार तो ज्या पदावर कार्यरत आहे, त्याच्या वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी देय ठरते" असे नमूद केले आहे.

उक्त तरतुदीनुसार आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रातील कार्यरत कर्मचाऱ्यांना देय असलेल्या एकस्तर पदोन्नती वेतनश्रेणीच्या लाभाबाबत स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित केल्या आहेत. उक्त परिपत्रकातील तरतूदी विचारात घेऊन संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात (शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त / आदिवासी म्हणून घोषित केलेली गावे / शहरे) इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एकस्तर पदोन्नतीचा लाभ लागु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय संदर्भ क्र.४, दि.१३.०३.२०२० याद्वारे अधिक्रमित करुन नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात (शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त / आदिवासी म्हणून घोषित केलेली गावे / शहरे) इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एकस्तर पदोन्नती योजना (मुळ पदाच्या नजीकची वरीष्ठ / पदोन्नतीची वेनतश्रेणी) लागु करण्यास खालील अटींच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

अ) नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात (शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त / आदिवासी म्हणून घोषित केलेली गावे / शहरे) इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती / आश्वासित प्रगती योजना किंवा एकस्तर पदोन्नती योजना या दोन्ही योजनांपैकी प्रथम ज्या योजनेंतर्गत तो लाभ मिळण्यास पात्र ठरेल, कारण दोन्हीही योजनेंतर्गत मिळणारा आर्थिक लाभ हा समान आहे. यास्तव, एका योजनेंतर्गत लाभ मिळाल्यानंतर दुसऱ्या योजनेंतर्गत वेगळ्याने लाभ देणे अभिप्रेत नाही. त्यानुसार पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ देण्यात यावा. तद्नंतर भविष्यात सदर कर्मचारी ज्या वेळी दुसऱ्या योजनेंतर्गत लाभ मिळण्यास पात्र ठरेल, त्यावेळेस तो आधीपासून पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी घेत असल्यास त्यास दुसऱ्या योजनेंतर्गत वेगळ्याने तोच लाभ अनुज्ञेय होणार नाही.

उक्त स्पष्टीकरणाचा सारांश असा आहे की, नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात (शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त / आदिवासी म्हणून घोषित केलेली गावे / शहरे) इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एका योजनेंतर्गत लाभ मिळाल्यानंतर दुसरी योजना लागू करू नये. म्हणजेच, एका योजनेंतर्गत लाभ दिल्यानंतर दुसऱ्या योजनेंतर्गत लाभ देय ठरेल, त्यावेळी पहिल्या योजनेंतर्गत दिलेला लाभ वसूल करून दुसऱ्या योजनेचा लाभ लागू करणे अभिप्रेत नाही. तसेच, पहिल्या योजनेचा लाभ चालू असताना दुसऱ्या योजनेंतर्गत त्यास आणखी वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ लागू करणे देखील अभिप्रेत नाही.

ब) सेवाप्रवेश नियमानुसार धारण करत असलेल्या पदावरून पदोन्नती देण्यासाठीचे वरिष्ठ पद अस्तित्वात असले तर, अशा प्रकरणी पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ देणे आवश्यक आहे. तथापि, जर सेवाप्रवेश नियमानुसार धारण करत असलेल्या पदावरून पदोन्नती देण्यासाठीचे वरिष्ठ पद अस्तित्वात नसल्याने पदोन्नतीची संधी उपलब्ध होत नसल्यास, वेतन आयोगाच्या पुस्तिकेत्त धारण केलेल्या मूळ पदाच्या वेतनश्रेणीच्या नजीकची जी वेतनश्रेणी नमूद करण्यात आली आहे, त्या वेतनश्रेणीचे लाभ देणे आवश्यक आहे.

२. नक्षलग्रस्त / आदिवासी क्षेत्रात (शासनाने वेळोवेळी नक्षलग्रस्त / आदिवासी म्हणून घोषित केलेली गावे / शहरे) इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी आश्रमशाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना एकस्तर पदोन्नती योजना (मुळ पदाच्या नजीकची वरीष्ठ / पदोन्नतीची वेनतश्रेणी) मंजूर करणेसंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) मुळ नियुक्ती आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात झाली असून संस्थेंतर्गत आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्राबाहेर बदलीपात्र नसलेले शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी मूळ नियुक्ती आदिवासी /

नक्षलग्रस्त क्षेत्रात झाल्यानंतर अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांस नियुक्तीनंतर लगेच एकस्तर पदोन्नती योजना लागू होते व त्यानुसार तो ज्या पदावर कार्यरत आहे त्याच्या वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी मंजूर करावी.

२) नियुक्तीपासून १२ वर्षे पदोन्नती पासून वंचित राहिल्यामुळे सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेस पात्र ठरतो. तथापि, तो एकस्तर योजनेंतर्गत वरिष्ठ पदाची वेतनश्रेणीत वेतन घेत असल्यास त्या कर्मचाऱ्यास सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ देय ठरणार नाही.

३) नियुक्तीपासून २४ वर्षाच्या एकूण सेवेनंतर त्यास सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ देय होईल. सबब, एकस्तर प्रगती योजनेंतर्गत नियुक्तीच्या मुळ पदाऐवजी पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी घेतली असल्याने २४ वर्षानंतर पदोन्नतीच्या पदाच्या आणखी वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ म्हणून लागू होईल.

४) मुळ नियुक्ती आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात झाली असून संस्थेंतर्गत आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्राबाहेर बदलीपात्र असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची बदली भविष्यात बिगर आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात झाल्यानंतर संबंधित शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यास देण्यात येत असलेला एकस्तर पदोन्नतीचा लाभ बंद करुन तो कर्मचारी ज्या पदावर कार्यरत असेल त्याच पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल. त्या पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय करत असतांना त्या पदावरील त्याच्या नियुक्तीच्या दिनांकापासून काल्पनिक वेतननिश्चिती करुन त्यानुसार वेतन देय होईल.

५) आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात कार्यरत असलेल्या शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेस पात्र ठरल्यानंतर बिगर आदिवासी/नक्षलग्रस्त बदली झाल्यास तो कर्मचारी सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभास पात्र ठरेल. अशा परिस्थितीत तो आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात कार्यरत असताना ज्या दिनांकास सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेस पात्र ठरला असता त्या दिनांकापासून सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभाची काल्पनिक वेतननिश्चिती करुन तो ज्या दिनांकास बिगर आदिवासी/ नक्षलग्रस्त क्षेत्रात रुजू होईल त्या दिनांकापासून प्रत्यक्ष वेतन देय ठरेल.

६) सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेस पात्र ठरण्यापूर्वीच बिगर आदिवासी/नक्षलग्रस्त भागात बदली झाल्यास ज्या दिनांकास सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेसाठी पात्र होईल त्या दिनांकापासून त्यास सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देय ठरेल.

७) मुळ नियुक्ती बिगर आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात झाली असून संस्थेंतर्गत आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात बदलीपात्र असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची बदली भविष्यात आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात झाल्यानंतर संबंधित शिक्षक / शिक्षकेतर कर्मचारी एकस्तर पदोन्नती योजनेस पात्र ठरतो. शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात बदली होण्यापुर्वी आश्वासित प्रगती योजनेंतर्गत पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ घेत नसल्यास आदिवासी / नक्षलग्रस्त बदली झाल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्यास एकस्तर पदोन्नती योजना लागु करावी.

८) शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रात बदली होण्यापुर्वीच आश्वासित प्रगती योजनेंतर्गत पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीचा लाभ घेत असल्यास आदिवासी / नक्षलग्रस्त बदली झाल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्यास एकस्तर पदोन्नती योजना लागू करण्यात येऊ नये.

९) आदिवासी /नक्षलग्रस्त क्षेत्रात कार्यरत असताना सेवानिवृत्त झाल्यास अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्ती वेतन निश्चित करतांना एकस्तर प्रगती योजनेंतर्गत दिलेले वेतन विचारात न घेता ज्या पदावर कार्यरत आहे त्या पदाच्या वेतनानुसार निवृत्तीवेतन निश्चित करावे.

**३.** सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग कार्यासन-१२ (सेवा-३) यांनी एकस्तर पदोन्नतीचा लाभ देण्याच्या अनुषंगाने या विभागाच्या नस्तीवर दिलेल्या अनौपचारिक अभिप्रायानुसार शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०६०४१५५९३८१०३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.06.04 16:00:18 +05'30'

**(कैलास साळुंके)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता (विधान परिषद / विधानसभा) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव
६. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सह सचिव / उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई(सर्व)
८. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व).
९. अवर सचिव /कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व)
१०. सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन समाज कल्याण (सर्व).
११. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
१२. निवडनस्ती (विजाभज-१)